**ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी सभेने पारीत केलेला ठराव क्र. २६१५, दिनांक १६.३.२०१३ व ठराव क्र. २६१६, दिनांक १६.३.२०१६ अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : -ठामपा-२११६/प्र.क्र.१०२/नवि-२३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- २९ मे, २०१७

संदर्भ :- (१) आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्र. ठामपा/कार्मिक /आयुक्त-१५२२/ ६१३५, दिनांक ०६.०२.२०१६
(२) शासन निर्णय सम क्रमांक दिनांक १३.१०.२०१६

प्रस्तावना : -

ठाणे महानगरपालिकेने श्री. मंगल शिंदे, सहायक आयुक्त व श्री. सुनिल पाटील, लिपिक व श्री. देविदास भोईर, क- वर्ग लिपिक माजिवाडा-मानपाडा प्रभाग समिती येथे कार्यरत होते. ठाणे महानगरपालिकेमार्फत अनधिकृत बांधकामांसंदर्भात वेळोवेळी कारवाई करण्याबाबतच्या सूचना दिल्यानंतरही त्यावर गांभीर्याने/जबाबदारीने विशिष्ट अशा कालमर्यादेत अनधिकृत बांधकामे निष्कासित करण्याची कार्यवाही न केल्याने श्री. मंगल शिंदे, सहायक आयुक्त व श्री. सुनिल पाटील, लिपिक व श्री. देविदास भोईर, क- वर्ग लिपिक माजिवाडा-मानपाडा प्रभाग समिती यांना ठाणे महानगरपालिकेच्या कार्यालयीन आदेश दिनांक ३०.०५.२००८ अन्वये सेवेतून निलंबित केले होते.

०२. तद्नंतर या प्रकरणी ठाणे महानगरपालिकेमार्फत करण्यात आलेल्या प्राथमिक चौकशी अहवालानुसार संबंधितांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ चे नियम ८ अन्वये विभागीय चौकशी प्रक्रिया पूर्ण करण्यात आली. विभागीय चौकशीतील निष्कर्षानुसार श्री. मंगल शिंदे, सहाय्यक आयुक्त यांनी माजिवडा-मानपाडा प्रभाग समिती क्षेत्रातील अनधिकृत बांधकामावर करावयाच्या कार्यवाहीच्या सामुहीक जबाबदारीमध्ये त्यांची स्वत:ची जबाबदारी असूनसुध्दा बऱ्याच ठिकाणी त्यांनी विलंबाने कार्यवाही पूर्ण झाल्याचे चौकशी अहवालात नमूद असल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ चे नियम ५(१) (एक) अन्वये त्यांचेवर ' ठपका ' ठेवण्यात आलेला आहे. तसेच श्री. सुनील पाटील, लिपिक व श्री.देवीदास भोईर, क-वर्ग लिपिक त्यांचेवर ठेवण्यात आलेला एक दोषारोप अंशत: सिध्द झाल्याने सदर दोन्ही कर्मचारी यांची ठाणे महानगरपालिकेच्या कार्यालयीन आदेश दिनांक २०.११.२०१२ अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ चे नियम ५(१) (चार ) अन्वये त्यांची एक वार्षिक वेतनवाढ पुढील वेतनवाढीवर परिणाम करुन रोखण्यात आली व त्यांचा निलंबन कालावधी हा निलंबन कालावधी म्हणून धरण्यात आला तसेच निवृत्त वेतन प्रयोजनार्थ सदरचा कालावधी हा अर्हताकारी सेवा कालावधी म्हणून धरण्यात आला.

०३. सदर आदेशाविरुध्द श्री.सुनील पाटील, लिपिक व श्री.देवीदास भोईर, क-वर्ग लिपिक यांनी अपिलीय प्राधिकरण म्हणून ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीकडे विहित मुदतीत अपील दाखल केले. ठाणे महानगरपालिकेच्या प्रशासनाने एकाच वेळी दोन शिक्षा सुनावलेल्या आहेत, त्या अन्यायकारक आहेत. त्यामुळे एक वार्षिक वेतनवाढ पुढील वेतन वाढीवर परिणाम न करता रोखणे ही शिक्षा पुरेशी आहे मात्र प्रशासनाने सुनावलेली शिक्षा क्र.२ दिनांक ३०.०५.२००८ ते दिनांक १०.१०.२००८ हा निलंबन कालावधी हा सेवा कालावधी धरण्यात यावा असा ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीमार्फत ठराव पारीत करण्यात आलेला होता.

०४. स्थायी समिती ठरावानुसार, श्री. सुनील पाटील, लिपिक व श्री.देविदास भोईर, क-वर्ग लिपिक यांना वर नमूद आदेशान्वये बजावण्यात आलेल्या शिक्षेबाबत केलेला ठराव क्र.२६१५ दिनांक १६.३.२०१३ व ठराव क्र.२६१६ दिनांक १६.३.२०१३ विचारात घेता श्री. सुनील पाटील, लिपिक व श्री.देविदास भोईर, क-वर्ग लिपिक यांचेवर त्यांची एक वार्षिक वेतनवाढ पुढील वेतनवाढीवर परिणाम न करता रोखणेची शिक्षा पुरेशी असल्याचे तसेच त्यांचा निलंबन कालावधी हा सेवा कालावधी म्हणून धरण्याबाबत ठराव केलेला आहे.

०५. ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारीत केलेला ठराव क्र. २६१५, दिनांक १६.३.२०१३ व ठराव क्र. २६१६, दिनांक १६.३.२०१६ विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी केली आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) अन्वये संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये उक्त ठराव निलंबित करण्यात आला होता. तसेच सदर शासन निर्णयात सदर प्रकरणी सबंधितांना शासनास काही अभिवेदन करावयाचे असल्यास निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत करणे आवश्यक राहील असे नमुद करण्यात आले होते.

तथापि, उपरोक्त प्रकरणी संबंधिताकडून अभिवेदन / अहवाल प्राप्त न झाल्याने सदर प्रकरणी शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय -:</u>**

ठाणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने ठराव क्र. २६१५, दिनांक १६.३.२०१३ व ठराव क्र. २६१६, दिनांक १६.३.२०१६ लोकहिताच्या व ठाणे महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०५३११२५९५२२२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, serialNumber=49349d578c976e0d05a9793ef412604378bdf9fed13d605caba002427a7c370b, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2017.05.31 13:01:52 +05'30'

**(अजित म.कवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, ठाणे महानगपालिका, जि. ठाणे
५) उप सचिव (श्री.परशुरामे), नगर विकास विभाग, यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महापालिका सचिव, ठाणे महानगपालिका
७) निवड नस्ती (नवि-२३) नगर विकास विभाग